**राज्य माहिती संचयिका STATE DATA BANK च्या वेबसाईट वरील संसदीय कार्य विभागाशी संबंधित माहिती अद्ययावत ठेवण्यासाठी नोडल अधिकारी, जबाबदार अधिकारी व समन्वयक यांची नियुक्ती करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## संसदीय कार्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः आस्थापना-२०१४/प्र.क्र.९२/पाच

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०००३२
तारीख: २५ ऑगस्ट, २०१४

**वाचा:-** नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.रामासं-२०१३/प्र.क्र.२२७/का-१४७१, दि. ७ जून, २०१४

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र शासनाने " राज्य माहिती संचयिका (STATE DATA BANK-SDB) " हा प्रकल्प हाती घेतला असून त्या अंतर्गतराज्य माहिती संचयिकेची वेबसाईट (संकेतस्थळ) विकसित करण्यात आलेली आहे. राज्य माहिती संचयिका या वेबसाईटवर लिंक करण्यात आलेली विभागांच्या संकेतस्थळावरील माहिती अद्ययावत ठेवण्यासाठी विभागांनी अनुसरावयाची कार्यपध्दती नियोजन विभागाने दिनांक ७ जून, २०१४ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेली आहे. त्यानुसार राज्य माहिती संचयिका या वेबसाईटवर संसदीय कार्य विभागाच्या वेबसाईटवरील माहिती लिंक करण्यासाठी व प्रस्तुत माहिती वेळोवेळी अद्ययावत ठेवण्यासाठी "नोडल अधिकारी", "जबाबदार अधिकारी" व समन्वयक म्हणून नियुक्त करण्याची बाब विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

राज्य माहिती संचयिका STATE DATA BANK (SDB) या वेबसाईटवर संसदीय कार्य विभागाच्या वेबसाईटवरील माहिती लिंक करण्यासाठी व प्रस्तुत माहिती वेळोवेळी अद्ययावत ठेवण्यासाठी श्री.सु.अ.देशपांडे, सह सचिव यांची "नोडल अधिकारी" आणि श्री.र.स.सरफरे, अवर सचिव यांची "जबाबदार अधिकारी" म्हणून नेमणूक करण्यात येत आहे. तसेच, या विभागाची वेबसाईटवरील माहिती अद्ययावत /अपडेट ठेवण्यासाठी व प्रस्तुत माहिती राज्य माहिती संचयिकेच्या वेबसाईटवर लिंक करण्यासाठी श्री.सु.म.क्षीरसागर, सहायक यांची "समन्वयक" म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे.

२. उपरोक्त नियुक्त करण्यात आलेल्या अधिकारी/ कर्मचाऱ्यांची विभागातून बदली झाल्यास, त्यांच्या जागी नियुक्त होणाऱ्या अधिकारी / कर्मचाऱ्याने उक्त काम पहावयाचे आहे. श्री.क्षीरसागर, सहायक यांनी संसदीय कार्य विभागाच्या वेबसाईटवरील, माहिती, अर्थ व सांख्यिकी संचालनालयाशी संपर्क साधून उक्त संचयिकेच्या वेबसाईटवर अपलोड करावी आणि प्रस्तुत महिती दर तीन महिन्यानंतर अद्ययावत ठेवावी. यापुढे, राज्य माहिती संचयिकेवरील माहिती शासकीय कामकाजात अधिकृत समजली जाणार असल्यामुळे

व सदर माहिती जनतेसाठी खुली असल्यामुळे, विभागाच्या वेबसाईट नियमित अद्ययावत ठेवण्याची दक्षता सर्व संबंधितांनी घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२६११२६४९२८१५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Suhas Anantrao Deshpande

Digitally signed by Suhas Anantrao Deshpande
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Parliamentary Affairs Dept, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Suhas Anantrao Deshpande
Date: 2014.08.26 11:23:08 +05'30'

**सु.अ.देशपांडे**
**सह सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अवर सचिव, संसदीय कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२. सर्व कार्यासन अधिकारी, संसदीय कार्य विभाग, मंत्रालय, , मुंबई-४०० ०३२.
३. श्री.सु.म.क्षीरसागर, सहायक, संसदीय कार्य विभाग, मंत्रालय, , मुंबई-४०० ०३२.

**प्रत माहितीसाठी अग्रेषित :-**

१. अपर मुख्य सचिव (नियोजन) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई-४०० ०३२.
४. उप संचालक (श्री सबनीस), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई- ४०० ०३२.
५. निवड नस्ती.